राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान अंतर्गत लघुअभियान -१ ( तेलबिया ) व लघुअभियान -३ ( वृक्ष आधारित तेलबिया) साठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये तिसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या निधीस वित्तीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१४/ प्र.क्र.३१/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

तारीख: ३० मार्च, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१४/प्र.क्र.३१/४अे, दि. १३ ऑगस्ट, २०१४ व दि. २८ जानेवारी, २०१५

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-१/२०१४-सीए-II ,दि.२६ फेब्रुवारी, २०१५ (तीन पत्रे)

३) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ./वि.प्र.-२/NMOOP १४-१५/वि.मा.ति.हप्ता./प.क्र. १६/९३/१५, दि. ०९ मार्च,२०१५

४) शासन निर्णय क्रमांक पुनर्वि-२०१५/प्र.क्र.१४(१५)/२-अे, दि. २८ जानेवारी, २०१५

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम, राष्ट्रीय कडधान्य विकास कार्यक्रम व गतीमान मका विकास कार्यक्रम राज्यात सन २०१३-१४ पर्यंत राबविण्यात येत होता. केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली आहे. त्यानुसार केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रमाऐवजी राष्ट्रीय तेलबिया व तेलताड ( National Mission on Oilseed and Oil Palm) या अभियानाची सुरवात केली आहे. सदर अभियानाअंतर्गत उपअभियान- १ ( तेलबिया ), उपअभियान-२ (तेलताड) व उपअभियान-३ ( वृक्षआधारित तेलबिया) या तीन उपअभियानांचा समावेश असणार आहे. या अभियानाच्या निधीत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे.

सन २०१४-१५ मध्ये सदर अभियान तेलबिया व वृक्षआधारित तेलबिया या दोन घटकांसाठीच राबविण्यात येणार आहे.

राष्ट्रीय तेलबिया व तेलताड ( National Mission on Oilseed and Oil Palm( NMOOP)) हे अभियान राज्यात सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी ₹ ५९३४.६४ लाख निधीच्या कार्यक्रमास दि. १३ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी दिली आहे. सदर निधीमध्ये केंद्र व राज्य

हिस्सा अनक्रमे ₹ ४५४४.२८ लाख व ₹ १३९०.३६ लाख असणार आहे. त्याचप्रमाणे सदर शासन निर्णयान्वये पहिल्या हप्त्यापोटी वितरीत केलेल्या ₹ १५९०.०० लाख (अक्षरी रूपये पंधरा कोटी नव्वद लाख फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. सदर अभियानाअंतर्गत केंद्र हिश्श्याच्या दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या ₹११४६.४८ लाख निधीच्या कार्यक्रमास दि. २८ जानेवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्रिय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन अ.क्र.२ च्या पत्रान्वये सदर अभियानाअंतर्गत केंद्र हिश्श्याच्या तिसऱ्या हप्त्यापोटी ₹ ६८१.६२ लाख निधी वितरित केला आहे. सदर निधीपैकी ₹ ६९.५३ लाख अनुसूचित जाती, ₹६०.६६ लाख अनुसूचित जमाती व ₹५५१.४३ लाख निधी सर्वसाधारण घटकासाठी आहे. कृषी आयुक्तालयाने केंद्र हिश्श्यापोटी वितरित केलेल्या निधीच्या अनुषंगाने कृषी आयुक्तालय स्तरावर बियाणे इ. घटकाच्या आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी राज्य हिश्श्यापोटी उपलब्ध असलेल्या निधीतून ₹ १.०० लाख निधीची आवश्यकता असल्याचे संदर्भाधीन अ.क्र. ३ च्या पत्रासोबत पाठविलेल्या मासीक निधी वितरण प्रपत्रान्वये कळविले आहे. त्यानुसार सदर अभियानाअंतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र हिश्श्याच्या तिसऱ्या हप्त्यापोटी वितरीत केलेले ₹ ६८१.६२ लाख व राज्य हिश्श्यापोटी आवश्यक असलेले ₹ १.०० लाख, असे मिळून एकूण ₹६८२.६२ लाख (अक्षरी रूपये सहा कोटी ब्याऐंशी लाख बासष्ट हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

१) केंद्र शासनाने पुर्नरचना केलेल्या राष्ट्रीय तेलबिया व तेलताड (National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)) या अभियानाअंतर्गत उपअभियान- १ (तेलबिया) व उपअभियान- ३ ( वृक्षआधारित तेलबिया ) राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिश्श्याच्या तिसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेला ₹ ६८१.६२ लाख व आयुक्तालय स्तरावर राज्य हिश्श्यापोटी बियाणे इ. घटकाच्या खर्चासाठी आवश्यक असणारा ₹१.०० लाख, अशा एकूण ₹ ६८२.६२ लाख (अक्षरी रूपये सहा कोटी ब्याऐंशी लाख बासष्ट हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास या आदेशान्वये शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२). केंद्र शासनाने तिसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या ₹६८१.६२ लाख निधीचे लघु अभियाननिहाय व संवर्गनिहाय वितरण पुढीलप्रमाणे राहील:-

(रूपये लाखात)

| अ. क्र. | उपअभियानाचे नाव | केंद्र हिस्सा | अनुसूचित जाती | अनुसूचित जमाती | सर्वसाधारण घटक |
|---|---|---|---|---|---|
| १ | लघुअभियान-१ ( तेलबिया ) | ६७४.३३ | ६८.७८ | ६०.०२ | ५४५.५३ |
| २ | लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) | ७.२९ | ०.७४ | ०.६५ | ५.९० |
| | एकूण | ६८१.६२ | ६९.५३ | ६०.६६ | ५५१.४३ |

३) केंद्र शासनाने तिसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेला ₹ ६८१.६२ लाख निधी व आयुक्तालय स्तरावर राज्य हिश्श्यापोटी बियाणे इ. घटकाच्या खर्चासाठी आवश्यक असणारा ₹ १.०० लाख, अशा एकूण ₹ ६८२.६२ लाख (अक्षरी रूपये सहा कोटी ब्याऐंशी लाख बासष्ट हजार फक्त) निधीचा खर्च सन २०१४-१५ करिता खालील लेखाशिर्षाअंतर्गत मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

(रूपये लाखात)

क) **मागणी क्रमांक डी-३, २४०१,पीक संवर्धन, ११४, तेलबियां**
**(००) (०६) राष्ट्रीय अभियान तेलबिया व तेलताड**
**लघु अभियान-१ (तेलबिया) ( केंद्र हिस्सा ७५ टक्के)**
**(२४०१ २४९८) ३३- अर्थसहाय्य, (योजनांतर्गत) (दत्तमत)** ६७४.३३

ख) **मागणी क्रमांक डी-३ , २४०१,पीक संवर्धन, ११४ , तेलबियां**
**(००) (१३ ) राष्ट्रीय तेलबिया आणि तेलताड अभियान**
**लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) (डिएसअेओ) (केंद्र हिस्सा ७५ टक्के)**
**(२४०१ ९४९२) (योजनाअंतर्गत ) ३३- अर्थसहाय्य (दत्तमत)** ७.२९

ग) **मागणी क्रमांक डी-३, २४०१,पीक संवर्धन,**
**(००) ११४ , तेलबियां, (००) (०१) राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान**
**उपअभियान-१ (तेलबिया) (राज्य हिस्सा २५ टक्के) (२४०१ १५३५)**
**(योजनाअंतर्गत )३३- अर्थसहाय्य (दत्तमत)** १.००

४) सदर निधीचा विनियोग करताना केंद्र शासनाने अभियानाच्या निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, तसेच दि.१८ जून, २०१४ च्या पत्रातील सूचना व मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार सन २०१४-१५ मध्ये राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा कार्यक्रम राबविण्यात येईल, याची दक्षता घेण्यात यावी. त्याचप्रमाणे दि. २६/०२/२०१४ च्या पत्रान्वये मंजूरी दिलेल्या अनुदानाच्या दराने व निकषाप्रमाणे कृती आराखड्याअंतर्गत मंजूर केलेल्या बाब निहाय कार्यक्रम राबविण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जात नाही, याबाबत आवश्यक ती दक्षता घ्यावी.

५) सदर अभियानाअंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेला ₹ ६८२.६२ लाख निधीचा कार्यक्रम सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनार्थ विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर, विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी व तालुका स्तरावर, तालुका कृषी अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

६) राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीतील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येतील.

७) सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे /पक्रियेचे /वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/ P.W.D. मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार /प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

८) राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून

उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी दि. १३ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरित केलेल्या परिच्छेद क्र ८ मधील मुद्या क्र I) ते VII) चा समावेश प्राथम्याने करावा.

९) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, व सदर अहवाल केद्र शासनास सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती शेतकरी व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक/आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळ्याने सादर होईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.

१०) सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.८१ /२०१५/व्यय-१, दि. २७ मार्च, २०१५ नुसार दर्शविलेल्या सहमतीनुसार व अपर मुख्य सचिव (कृषी व पणन) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१३११०१५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Hoktuji Chawre

Digitally signed by Siddharth Hoktuji Chawre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Hoktuji Chawre
Date: 2015.03.30 13:21:35 +05'30'

**( सिध्दार्थ चवरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
३. संचालक ( फलोत्पादन ), कृषि आयुक्तालय, पुणे
४. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. जिल्हाधिकारी, (सर्व)

७. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१३.व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१४.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१५.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१७.महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१८. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१९.वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
२०.सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२२.सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन प्रभाग)
२३.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२४.मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२५.निवडनस्ती